**केंन्द्र पुरस्कृत राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी जिल्हा पाणी पुरवठा व स्वच्छता मिशन (DWSM) स्थापन करण्याबाबत**

# महाराष्ट्र शासन

**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**

शासन शुद्धिपत्रक क्रमांकः ग्रापाधो १११०/ प्र. क्र. २४६ (अ)/पापु-०७,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दि.१७ सप्टेंबर,२०११

वाचावे : १.शा. नि.,पा.पु.व स्व.वि.ग्रापाधो १११०/प्र.क्र. २४६ (अ)/पापु ०७,दि. १५जुलै,२०११
२. शासन शुद्धिपत्रक क्रमांकः ग्रापाधो १११०/ प्र. क्र. २४६ (अ)/पापु-०७,दि.३ ऑगस्ट,२०११

**प्रस्तावनाः**

संदर्भाधिन दि.१५/७/२०११ च्या शासन परिपत्रकान्वये केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनांनुसार राज्यातील जिल्हा पाणी पुरवठा व स्वच्छता मिशनकरीता प्रत्येक जिल्ह्यात सल्लागार / तज्ञांची नियुक्ती करण्यास शासनाची मान्यता देण्यात आली आहे.या सल्लागारांची नियुक्ती करण्यासाठी ५० गुणांची बहुपर्यायी वस्तुनिष्ठ लेखी परिक्षा व २५ गुणांची तोंडी परिक्षा घ्यावयाची आहे. लेखी परिक्षेमध्ये सर्वोच्च गुण मिळविणा-या उमेदवारांमधून एकास पाच या प्रमाणात उमेदवारांना मुलाखतीसाठी आमंत्रीत करावयाचे आहे.

शासनाच्या या निर्देशानुसार जिल्हा पाणी पुरवठा व स्वच्छता मिशन करीता भरावयाच्या पदांकरिता जिल्हा स्तरावर भरती प्रक्रिया सुर झाल्यानंतर ब-याच जिल्हा परिषदांनी शासनाच्या असे निदर्शनास आणून दिले की,या पदांकरिता अनेक जिल्ह्यांमध्ये पाच व त्यापैक्षा कमी अर्ज प्राप्त झाले आहेत.त्यामुळे अशा प्रकरणी उमेदवारांची लेखी परिक्षा न घेता त्यांची थेट तोंडी परिक्षा घेऊन त्यांना नियुक्ती द्यावी किंवा कसे याबाबत मार्गदर्शन करण्याची विनंती शासनास करण्यात आली आहे.ही बाब विचारात घेऊन यासंदर्भात सुधारीत निर्देश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन शुद्धिपत्रक :**

प्रस्तावनेत नमूद केलेली परिस्थिती विचारात घेता याबाबत पुढीलप्रमाणे कार्यवाही करण्याचे निर्देश देण्यात येत आहेत-

१. ज्या जिल्ह्यांमध्ये जिल्हा पाणी पुरवठा व स्वच्छता मिशन करीता भरावयाच्या पदांकरिता सहा व त्यापेक्षा जास्त पात्र अर्ज प्राप्त झाले असतील अशा जिल्ह्यांमध्ये ५० गुणांची लेखी परिक्षा घेण्यात यावी. लेखी परिक्षा संदर्भाधिन दि.१५/७/२०११ च्या शासन परिपत्रकात नमुद केल्याप्रमाणे घेण्यात यावी. लेखी परिक्षेमध्ये उत्तीर्ण होण्याकरिता उमेदवारांनी किमान ४५% गुण प्राप्त करणे आवश्यक राहील.लेखी परिक्षेतील गुण तसेच उमेदवाराची उच्च शैक्षणिक अर्हता व अनुभव याकरिता अनुक्रमे ५ व १० गुण देऊन सोबत जोडलेल्या जोडपत्र **अ** नुसार गुणवत्तेच्या आधारे निवडसूची तयार करुन त्यानुसार उमेदवारांची निवड करावी.

२.	ज्या जिल्ह्यांमध्ये पाच व त्यापेक्षा कमी पात्र अर्ज प्राप्त झाले असतील अशा जिल्ह्यांमध्ये लेखी परिक्षा न घेता ५० गुण संबंधित पदाकरीता विहित करण्यात आलेल्या किमान शैक्षणिक अर्हतेमध्ये उमेदवारांनी प्राप्त केलेल्या टक्केवारीनुसार देण्यात यावे. तर, १० गुण अनुभवासाठी व ५ गुण उच्च शैक्षणिक अर्हतेसाठी देण्यात य़ावे.उमेदवारांना किमान शैक्षणिक अर्हता, उच्च शैक्षणिक अर्हता व अनुभव यासाठी गुण देतांना सोबत जोडलेल्या जोडपत्र **ब** चा वापर करावा.त्या आधारे गुणवत्ता यादी तयार करुन उमेदवारांची निवड करावी.

३.	सदर शासन शुद्धिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेब-साईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०९१७१४१९०७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

सही/-
(र.अं.खडसे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

मा.मंत्री(पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव,
मा.राज्य मंत्री(पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव,
सर्व विभागीय आयुक्त,
सदस्य सचिव,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,मुंबई
संचालक,भुजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,पुणे,
मुख्य कार्यकारी अधिकारी,सर्व जिल्हा परिषदा
सर्व अधिक्षक अभियंता,विभागीय भारत निर्माण कक्ष
सर्व कार्यकारी अभियंता,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,
सर्व कार्यकारी अभियंता,ग्रामिण पाणी पुरवठा विभ ाग,जिल्हा परिषद
महालेखापाल,महाराष्ट्र - १ मुंबई(लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता)
महालेखापाल,महाराष्ट्र - २ नागपूर (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता)
मुख्य लेखा परिक्षक,स्थानिक निधी लेखा,नवी मुंबई
उप मुख्य लेखा परिक्षक,स्थानिक निधी लेखा, नाशिक,पुणे,औरंगाबाद,अमरावती व नागपूर
सर्व प्रादेशिक उपसंचालक,भुजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,
सर्व प्रादेशिक मुख्य अभियंता,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण
मुख्य अभियंता,भारत निर्माण कक्ष,नवी मुंबई
सर्व जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भुजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा
सर्व गट विकास अधिकारी,पंचायती समिती
नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई
वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई
पाणी पुरवठा विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी व कार्यासने
निवड नस्ती,पापु-०७

## जोडपत्र अ

(शासन शुद्धिपत्रक क्र ग्रापाधो १११०/ प्र. क्र. २४६ (अ)/पापु-०७, दि.१७ सप्टेंबर,२०११)
सहा व त्यापेक्षा जास्त पात्र अर्ज प्राप्त झालेल्या झालेल्या जिल्ह्याकरीता गुणदान तक्ता

| अ.क्र. | उमेदवाराचे नाव | लेखी प्राप्त झालेले गुण (५० गुणांपैकी) | उच्च शैक्षणिक अर्हता (Higher Qualification) (५ गुणांपैकी) | अनुभव (१० गुणांपैकी) | एकूण गुण (६५ गुणांपैकी) | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| | | | | | | |

टिप- दोन वर्षापर्यंतच्या अनुभवास शुन्य गुण, दोन ते तीन वर्षाच्या अनुभवास ३ गुण ,तीन ते पाच वर्षाच्या अनुभवास ५ गुण व पाच वर्षापेक्षा जास्त अनुभवास १० गुण देण्यात यावे.

## जोडपत्र ब

(शासन शुद्धिपत्रक क्र ग्रापाधो १११०/ प्र. क्र. २४६ (अ)/पापु-०७, दि.१७ सप्टेंबर,२०११)
पाच व त्यापेक्षा कमी पात्र अर्ज प्राप्त झालेल्या झालेल्या जिल्ह्याकरीता गुणदान तक्ता

| अ.क्र. | उमेदवाराचे नाव | किमान शैक्षणिक अर्हता * (Basic Qualification) (५० गुणांपैकी) | उच्च शैक्षणिक अर्हता (Higher Qualification) (५ गुणांपैकी) | अनुभव ** (१० गुणांपैकी) | एकूण गुण (६५ गुणांपैकी) | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| | | | | | | |

* किमान शैक्षणिक अर्हतेसाठी खालीलप्रमाणे गुण देण्यात यावे :
  - अ) किमान शैक्षणिक अर्हतेनुसार पात्र असल्यास -३० गुण
  - ब) किमान शैक्षणिक अर्हतेमध्ये ८० टक्केपर्यंत गुण असल्यास - ४० गुण
  - क) किमान शैक्षणिक अर्हतेमध्ये ८० टक्केपेक्षा जास्त गुण असल्यास -५० गुण

** दोन वर्षापर्यंतच्या अनुभवास शुन्य गुण, दोन ते तीन वर्षाच्या अनुभवास ३ गुण ,तीन ते पाच वर्षाच्या अनुभवास ५ गुण व पाच वर्षापेक्षा जास्त अनुभवास १० गुण देण्यात यावे.